**अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६, नियम २००८ आणि सुधारित नियम, २०१२.**

**UNDP-MOTA अंतर्गत खोज संस्थेमार्फत ०५ जिल्हयातील ५० गावांच्या तयार केलेल्या संवर्धन व व्यवस्थापन आराखडाच्या अंमलबजावणीसाठी समन्वयक व संनियंत्रक म्हणून नेमणूक करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन

आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः वहका-२०१५/प्र.क्र.९९/का-१४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक:- ०१ सप्टेंबर, २०१५.

वाचा -

१) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ आणि सुधारित नियम २०१२.

२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. वहका-२०१४/प्र.क्र.६६/कार्या-१४, दि. २४ जून, २०१५.

३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बैठक-२०१३/प्र.क्र.२७२, दि. १२ जून, २०१५ व शासन शुध्दीपत्रक क्रमांकः बैठक-२०१३/प्र.क्र.२७२/का-१४, दि. २८/०८/२०१५.

प्रस्तावना:-

अनुसूचित जमाती, इतर पारंपारिक वन निवासी ( वन हक्काची मान्यता) अधिनियम,२००६ व नियम २००८ तसेच सुधारित नियम २०१२ ची प्रभावी अंमलबजावणी अंतर्गत कलम ३(१) खाली मंजूर करण्यात येणा-या सामुहिक वनहक्क कायद्याचे नियोजनबध्द पध्दतीने व्यवस्थापन करुन ग्रामसभेचे बळकटीकरण करण्याकरिता तसेच वनावर उपजीविका अवलंबून असलेल्या ग्रामीण समाजाला निरंतर व शाश्वत उपजिविका उपलब्ध करुन देणे, वनांचे व नैसर्गिक साधनसंपत्तीचे संवर्धन, संरक्षण व पुर्ननिर्माणाकरीता परिणामकारक व कार्यक्षम व्यवस्थापन पध्दत अवलंबिण्यासाठी पथदर्शी प्रकल्पाअंतर्गत MOTA-UNDP योजनेंतर्गत खोज संस्थेमार्फत कार्यक्रम हाती घेण्यात आला होता.

२. सदर योजनेंतर्गत सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीचे गठन करणे, सदर समितीच्या सदस्यांना प्रशिक्षण देणे, सदर ग्रामसभा अंतर्गत समितीच्या संरक्षण व व्यवस्थापन आराखडयाविषयी ग्रामसभेमध्ये चर्चा करणे, कार्यवाहीची पध्दत ठरविणे आणि सदर ग्रामसभांमार्फत कामे करणे, स्वयंसेवी संस्था सेवकांची निवड करणे, तद्नंतर संवर्धन व व्यवस्थापन आराखडा तयार करुन ग्रामसभेपुढे मांडणे, इतर विभागांच्या सुचना विचारात घेणे व ग्रामसभेत झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने सूचनांचा समावेश

सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समितीच्या वनसंवर्धन व व्यवस्थापन आराखडयात समाविष्ट करुन आराखडयास अंतिमत: मंजूरी देणे इ. बाबी सदर योजनेंतर्गत अपेक्षित आहेत.

३. सामूहिक वनहक्कांचे (CFR) ग्रामसभा स्तरावर व्यवस्थापन व संनियंत्रण करण्यासाठी तसेच अशासकीय संस्थांमार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या अंमलबजावणीवर प्रभावी नियंत्रण व संनियंत्रण ठेवणे, मार्गदर्शन करणे, योजनेचे मुल्यमापन करणे तसेच योजनेचा नियमित आढावा घेण्याकरिता दिनांक ०५/०३/२०१४ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय सुकाणू समितीची (State Level Steering Committee) स्थापन करण्यात आली आहे.

४. UNDP-MOTA योजनेंतर्गत व खोज संस्थेतर्फे अमरावती, यवतमाळ, गडचिराली, गोंदिया व नागपूर या ०५ जिल्ह्यातील ५० गावांमध्ये हाती घेतलेला पथदर्शी प्रकल्पातील ५० गावांसाठी तयार केलेल्या व्यवस्थापन आराखड्यानुसार घ्यावयाच्या कामांसाठी क्षेत्रिय स्तरावरील विविध शासकीय यंत्रणांच्या सेवा उपलब्ध करुन देणे व कामांचे समन्वयन साधण्यासाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली “जिल्हास्तरीय कन्र्व्हजन्स समिती” स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात आलेली आहे.

**शासन निर्णय** :-

राज्यस्तरीय सुकाणू समितीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार व त्याअनुषंगाने विदर्भ निसर्ग संरक्षण संस्था, नागपूर (VNCS) यांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावानुसार UNDP-MOTA योजनेंतर्गत अमरावती, यवतमाळ, गडचिराली, गोंदिया व नागपूर या ०५ जिल्हयातील ५० गावातील तयार केलेल्या “वनसंवर्धन व व्यवस्थापन आराखड्यातील” कामांची अंमलबजावणी करण्यासाठी तसेच “जिल्हास्तरीय कन्र्व्हजन्स समिती” च्या माध्यमातून क्षेत्रिय स्तरावरील विविध शासकीय यंत्रणांच्या सेवांचे / कामांचे समन्वयन साधण्यासाठी “विदर्भ निसर्ग संरक्षण संस्था, नागपूर (VNCS)” यांची मुख्य अंमलबजावणीधारक संस्था व खोज, अचलपूर, अमरावती व ग्रामिण समस्या मुक्ती ट्रस्ट, यवतमाळ या सहयोगी संस्था यांची “समन्वयक व सनियंत्रक” म्हणून नेमणूक करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर योजनेकरीता दोन वर्षाच्या कालावधीसाठी खालील परिच्छेद क्र. २ मध्ये अंदाजपत्रकात दर्शविण्यात आलेल्या कामांकरीता एकुण रु. ५७,२६,४९०/- (रूपये सत्तावन्न लक्ष सव्वीस हजार चारशे नव्वद फक्त) इतक्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेंतर्गत ०५ जिल्ह्यातील ५० गावांतील सुलभीकरणाच्या (Facilitation Cost) खर्चाचे अंदाजपत्रक खालीलप्रमाणे आहे:-

<u>**अंदाजपत्रक.**</u>

१) ०५ जिल्हयातील ५० गावांकरिता एकूण ८ क्षेत्रीय समन्वयकांची नियुक्ती असेल. गावांची भौगोलिक परिस्थिती लक्षात घेऊन त्यांचे क्षेत्रांमध्ये कमीत-कमी ५ व जास्तीत-जास्त ७ गावांची निवड करतील. शक्यतो या समन्वयकांची नियुक्ती तालुक्याला एक व गावांची लोकसंख्या कमी असेल तर २ तालुके मिळून एक समन्वयकाची नियुक्ती करण्यात येईल.

अ) ८ क्षेत्रीय समन्वयक प्रति महिना रु. १०,००० x १२ महिने एकूण रु. ९,६०,०००/-

ब) ८ क्षेत्रीय समन्वयकांचा प्रवास खर्च प्रति महिना रु. १५००x १२ महिने एकूण रु.१,४४,०००/-

क) दोन (०२) कार्यक्रम संचालक यांचे प्रोजेक्ट डायरेक्टर मानधन प्रति महिना रु.३०००० x १२ महिने एकूण रु. ७,२०,०००/-

ड) दोन (०२) कार्यक्रम संचालक यांचे प्रोजेक्ट डायरेक्टर प्रवास खर्च प्रति महिना रु. ८००० x १२ महिने एकूण रु. १,९२,०००/-

इ) जिल्हास्तरीय व राज्यस्तरीय बैठकी संदर्भात प्रवास, निवास, भोजन इ. खर्च रु. २,००,०००/- (ठोक)

प) २ प्रशिक्षण व कार्यशाळा खर्च ( यात प्रतिनिधींचा प्रवास,भोजन,निवास,संसाधन व्यक्तीचे मानधन इ. खर्च ) १५० व्यक्तींकरिता रु. १५००/- एकूण रु. ४,५०,०००/-

फ) फोन खर्च एकूण रु. ४०,०००/-

ग) स्टेशनरी /झेरॉक्स/फोटो/प्रिंटींग इ. खर्च एकूण रु.६०,०००/-

अ) एकूण प्रकल्पाचा १ वर्षाचा खर्च रु. २४,५९,०००/-

अ.१. एकूण खर्चावरती संस्थेचे शुल्क १० टक्के रु.२,४५,९००/-

एकूण खर्च अ (रु.२४,५९,०००) + अ.१ (रु.२,४५,९००) = रु.२७,०४,९००/-

ब) दुस-या वर्षाचा खर्च (पहिल्या वर्षाच्या खर्चामध्ये १० टक्के महागाई खर्च वाढ)

( रु.२७०४९००/-) या रक्कमेवर १० टक्के रु. २,७०,४९० /-) रु.२९,७५,३९०/-

क) एकूण प्रकल्पाचा खर्च = अ (पहिले वर्ष )+ ब (दुसरे वर्ष)

रु.२७,०४,९०० + रु.२९,७५,३९०= रु. ५६,८०,२९०/-

| | अंदाजपत्रक- पहिले वर्ष | | | | | | अंदाजपत्रक- दुसरे वर्ष | | | | पहिले वर्ष + दुसरे वर्ष |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ८ क्षेत्रीय कार्यकर्ता (५/७ गावे /तालुका मिळून एक क्षेत्रिय अधिकारी) | ८ | १२ | १०,०००.००/- | ९,६०,०००.००/- | | ८ | १२ | १०,०००.००/- | ९,६०,०००.००/- | १९,२०,०००.००/- |
| २ | प्रवास खर्च (क्षेत्रीय कार्यकर्ता) | ८ | १२ | १,५००.००/- | १,४४,०००.००/- | | ८ | १२ | १,५००.००/- | १,४४,०००.००/- | २,८८,०००.००/- |
| ३ | कार्यक्रम संचालक,नागपूर व अमरावती (प्रति एक व्यक्ती) मानधन | २ | १२ | ३०,०००.००/- | ७,२०,०००.००/- | | २ | १२ | ३०,०००.००/- | ७,२०,०००.००/- | १,४४,०००.००/- |
| ४ | प्रवास खर्च (कार्यक्रम संचालक) | २ | १२ | ८,०००.००/- | १,९२,०००.००/- | | २ | १२ | ८,०००.००/- | १,९२,०००.००/- | ३,८४,०००.००/- |
| ५ | राज्यस्तरीय सुकाणू समिती / जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समितीच्या बैठकीकरिता प्रवास खर्च | प्रत्यक्ष बैठकी नुसार खर्च | | | १,००,०००.००/- | | | | | १,००,०००.००/- | २,००,०००.००/- |
| ६ | अभ्यास दौरा आणि प्रशिक्षण -२ जिल्हास्तरीय व राज्यस्तरीय कार्यशाळा १५० व्यक्तींकरिता | यामध्ये -प्रवास खर्च, निवास, संसाधन व्यक्तीचा खर्च | १ | १,५००.००/- | २,२५,०००.००/- | | | १ | १,५००.००/- | २,२५,०००.००/- | ४,५०,०००.००/- |

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ७ | फोन खर्च-क्षेत्रीय कार्यकर्ता व कार्यकारी संचालक यांचा | | १२ | ४,०००.००/- | ४८,०००.००/- | | | १२ | ४,०००.००/- | ४८,०००.००/- | ९६,०००.००/- |
| ८ | स्टेशनरी/झेरॉक्स/ टायपिंग/फोटो/ अहवाल इ. खर्च | | १२ | ५,०००.००/- | ६०,०००.००/- | | | १२ | ५,०००.००/- | ६०,०००.००/- | १,२०,०००.००/- |
| ९ | अंकेक्षण खर्च | १ | | १०,०००.००/- | १०,०००.००/- | | १ | | १०,०००.००/- | १०,०००,००/- | २०,०००.००/- |
| १० | संस्थेचा खर्च ( बजेटच्या १० टक्के) | | | | २,४५,९००.००/- | | | | | २,४५,९००.००/- | ४,९१,८००.००/- |
| | **एकूण खर्च** | | | | **२७,०४,९००.००/-** | | | | | **२९,७५,३९०.००/-** | **५६,८०,२९०.००/-** |
| | | | | | | | | | | | |

३. सदर योजनेची मुख्य अंमलबजावणीधारक संस्था विदर्भ निसर्ग संरक्षण संस्था, नागपूर असून योजनेंतर्गत निधीचे वितरण विदर्भ निसर्ग संरक्षण संस्था, नागपूर यांना करण्यात येईल. सदर योजनेंतर्गत अंमलबजावणी संस्थेच्या जबाबदारीमध्ये प्रामुख्याने खालील बाबींचा / कामांचा समावेश असेल:-

१) ५० ग्रामसभा / सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती (CFRMC) समवेत सामूहिक वनहक्काच्या अंमलबजावणीचे समन्वयन करणे.

२) "जिल्हास्तरीय कन्व्हेजन्स समिती" अंतर्गत वेगवेगळ्या क्षेत्रिय यंत्रणेबरोबर संबंधित सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती (CFRMC) /ग्रामसभांच्या व्यवस्थापन आराखड्याचे नियोजन व अंमलबजावणीबाबत समन्वयन करणे.

३) ज्या ५० ग्रामसभा / सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती (CFRMC) यांचे व्यवस्थापन आराखडे ज्या स्थानिक अशासकीय संस्थांनी तयार केले आहेत त्यांची पुढील अंमलबजावणी करण्यासाठी समन्वयन करणे.

३. सदर योजनेचा कालावधी दोन वर्षाचा असेल. सदर योजनेंतर्गत निधीचे वितरण कार्यक्रम पत्रकानुसार व प्रगतीनुसार टप्प्याटप्प्याने करण्यात येईल.

४. सदर योजनेच्या अंमलबजावणीकरीता विदर्भ निसर्ग संरक्षण संस्था, नागपूर (VNCS) व शासनामध्ये यासंदर्भात करारनामा करण्यात येईल.

५. सदर योजनेची अंमलबजावणी अनुसूचित जमाती, इतर पारंपारिक वन निवासी ( वन हक्काची मान्यता) अधिनियम,२००६ व नियम २००८ तसेच सुधारित नियम २०१२ मधील तरतूदींनुसार तसेच सदर संस्थेने शासनासमवेत केलेल्या योजनेच्या करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार करण्याची जबाबदारी संबंधित अशासकीय संस्थावर राहील.

६. विदर्भ निसर्ग संरक्षण संस्था, नागपूर व अन्य सहयोगी संस्थांनी राज्यस्तरीय सुकाणू समितीच्या बैठकीत सदर योजनेचा त्रैमासिक अहवाल सादर करतील.

७. या योजनेवरील खर्च हा केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या विशेष केंद्रीय सहाय्य अनुदानातून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०९०२१३०१११८७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar Bapurao Gawade

Digitally signed by Prabhakar Bapurao Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prabhakar Bapurao Gawade
Date: 2015.09.02 13:04:47 +05'30'

**( प्रभाकर बा. गावडे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव

२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४ प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
५ प्रधान सचिव (कृषी व पदुम), मंत्रालय, मुंबई
६. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
८. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
९. सर्व जिल्हाधिकारी.
१०. सर्व मुख्य प्रशासकीय अधिकारी, जिल्हापरिषद.
११.अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर, अमरावती,
१२.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१३.संबंधित अशासकिय संस्था, विदर्भ निसर्ग संरक्षण संस्था, गोंदिया, गडचिरोली व नागपूर / युवा ग्रामीण, गोंदिया / खोज, अमरावती / ग्रामीण समस्या मुक्ती ट्रस्ट, यवतमाळ.
१४.सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्या.अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
१५.निवड नस्ती.(का.१४)आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.